**सार्वजनिक खाजगी सहभाग धोरण-२०१४ मध्ये सुधारणा करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय- खाक्षेस-२०२४/प्र.क्र.२३/रस्ते-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक- १४ फेब्रुवारी, २०२५

**वाचा:-** शासन निर्णय क्रमांक: खाक्षेस-२०१३/प्र.क्र.८३/रस्ते-९, दिनांक- ३१ जुलै, २०१४.

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाच्या रस्ते वाहतुक व महामार्ग मंत्रालयाने (MoRTH) भारतीय राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरण (NHAI) अंतर्गतचे प्रकल्पावरील पथकर स्थानकावर National Electronic Toll Collection कार्यक्रमाअंतर्गत FASTag प्रणाली लागू केली. सदर प्रणालीचा उद्देश पथकर वसूली रोखऐवजी डिजिटाइज पद्धतीने करणे, वेगवान प्रणाली, पथकरातुन जमा रक्कमेचा तपशील संगणकीय प्रणालीवर तात्काळ उपलब्ध असणे, एकंदरीत पथकर वसूलीमध्ये पारदर्शकता वाढविणे असा आहे.

दि.०१.१२.२०१९ पासून राष्ट्रीय महामार्गावरील सर्व पथकर स्थानकांवर पथकर वसूली करण्याकरिता FASTag प्रणाली लागू करण्यात येऊन सन २०२१ पासून भारतीय राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरण (NHAI) अखत्यारीतील सर्व प्रकल्पावर १०० टक्के पथकर वसूली FASTag प्रणाली अंतर्गत करणे अनिवार्य करण्यात आले.

केंद्र शासनाच्या धर्तीवर राज्याच्या अखत्यारीतील खाजगीकरणांतर्गत प्रकल्पावर National Electronic Toll Collection (NETC) कार्यक्रमाअंतर्गत FASTag प्रणाली लागू करण्याचे निर्देश दि.१४.०३.२०१९ च्या शासन पत्रान्वये क्षेत्रीय कार्यालयास देण्यात आले आहेत.

त्यानुषंगाने सार्वजनिक खाजगी सहभाग धोरण-२०१४ मधील “परिशिष्ट-अ” (उपभोक्ता शुल्काचे दर व संबंधित बाबी विषयक नियमावली) मध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

दि.०७.०१.२०२५ रोजी संपन्न झालेल्या मा. मंत्रीमंडळाच्या बैठकीत - सार्वजनिक खाजगी सहभाग धोरण-२०१४ मधील **परिशिष्ट-अ** (उपभोक्ता शुल्काचे दर व संबंधित बाबी विषयक नियमावली) मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

१. पथकर शुल्क केवळ ई-टॅग किंवा फास्ट - टॅगद्वारे भरणे अनिवार्य राहील.
२. जर वापरकर्त्याला ई-टॅग किंवा फास्ट टॅग व्यतिरिक्त रोख, स्मार्ट कार्ड, पीओएस, क्रेडिट/ डेबिट कार्ड QR कोड किंवा इतर कोणत्याही माध्यमाद्वारे वापरकर्ता शुल्क भरायचे असेल अशा वाहनांच्या वापरकर्त्यास वाहनांच्या विहित त्या श्रेणीसाठी लागू असणाऱ्या शुल्काच्या दुप्पट शुल्क भरावे लागेल.

३. वैध आणि कार्यरत नसलेले ई-टॅग किंवा फास्ट - टॅगशिवाय वाहनाने पथकर नाक्यावर अथवा FASTag मार्गिकेमध्ये प्रवेश केल्यास, अशा वाहनांच्या वापरकर्त्यास वाहनांच्या विहित त्या श्रेणीसाठी लागू असणाऱ्या शुल्काच्या दुप्पट शुल्क भरावे लागेल.

४. वाढीव/ अतिरिक्त शुल्क, वसुली प्राधिकरणाकडे दैनंदिन आधारावर किंवा प्राधिकरणाशी केलेल्या सहमतीनुसार नमुद कालावधीत जमा करणे बंधनकारक राहील.

वरील नमूद सुधारणा सद्यस्थितीत पथकर वसुली प्रगतीत असलेल्या व यापुढे पथकर वसुली सुरू करण्यात येणाऱ्या प्रकल्पांना लागू राहील.

५. सदर निर्णय **दिनांक ०१ एप्रिल, २०२५** पासून अंमलात येईल.

मा. मंत्रीमंडळाने घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने सार्वजनिक खाजगी सहभाग धोरण-२०१४, दि.३१ जुलै, २०१४ अंतर्गत सुधारित तरतुद सोबतच्या **परिशिष्ट-अ** मध्ये दर्शविण्यात आली आहे. उक्त शासन निर्णयातील इतर तरतुदीमध्ये कोणताही बदल करण्यात येत नसुन, सदरहू तरतुदी यापुढेही लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२५०२१४१७३७०२६४१८ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PARAG DHRUV RAIPURE

Digitally signed by PARAG DHRUV RAIPURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=4f5580a86eda4232e6c135ce4483bfc18113af6e63f1c8b2facb8b79cfc30f09, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=10E29F5CD6EEBEA3D7F57596F262D62AF257D1C02C1970EB4E6053F5FFC4F2E2, cn=PARAG DHRUV RAIPURE
Date: 2025.02.14 17:38:51 +05'30'

**( पराग रायपुरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उपमुख्यमंत्री (नगर विकास, गृह निर्माण, सा.बां.(सा.उ.)) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन, राज्य उत्पादन शुल्क) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (सा.बां.), मंत्रालय, मुंबई.
७. सचिव (रस्ते/ बांधकामे), सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते किास महामंडळ (मर्या.), मुंबई.
९. केंद्र शासनाचे सचिव, सहसचिव (Infrastructure and Investment), आर्थिक कार्य विभाग, वित्त मंत्रालय, MORTH, केंद्र शासन/ सह संचालक, PPP cell, आर्थिक कार्य विभाग, वित्त मंत्रालय.
१०. अध्यक्ष, भारतीय राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरण, नवी दिल्ली/ मुख्य महाव्यवस्थापक, भारतीय राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरण, मुंबई, महाराष्ट्र.

११. सर्व मुख्य अभियंता/ मुख्य अभियंता, राष्ट्रीय महामार्ग कोंकण भवन, नवी मुंबई/ सर्व अधीक्षक अभियंता/ सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग.
१२. सर्व मुख्य अभियंता/ सर्व अधीक्षक अभियंता/ सर्व कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ.
१३. सर्व उपसचिव, अवर सचिव, कार्यासन अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
१५. महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/ निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१७. सर्व विभागीय आयुक्त.
१८. सर्व जिल्हाधिकारी.
१९. निवासी अभियंता, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली.
२०. कार्यासन रस्ते-९, कार्यासन रस्ते-९अ, कार्यासन रस्ते-८, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

## परिशिष्ट-अ
## (उपभोक्ता शुल्काचे दर व संबंधित बाबी विषयक नियमावली)

दि.०७.०१.२०२५ रोजी संपन्न झालेल्या मा. मंत्रीमंडळाच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार शासन निर्णय क्रमांक: खाक्षेस-२०१३/प्र.क्र.८३/रस्ते-९, दिनांक- ३१ जुलै, २०१४ **परिशिष्ट-अ** मधील कलम क्र.५-“उपभोक्ता शुल्कांची वसुली” (Collection of User Fee) मध्ये करण्यात आलेले बदल खालीलप्रमाणे-

| प्रचलित तरतुद | सुधारित तरतुद |
|---|---|
| ५. उपभोक्ता शुल्कांची वसुली<br>(I) या नियमांतर्गत लागू होणारे उपभोक्ता शुल्क यथा प्रकार राज्य शासन अथवा अंमलबजावणी प्राधिकारी अथवा उद्योजक यांच्याकडून पथकर स्थानकावर गोळा करण्यात येईल. | ५. उपभोक्ता शुल्कांची वसुली<br>(I) बदल नाही. |
| (II) रस्ता, कायम स्वरुपी पूल, वळण रस्ता अथवा भुयारी मार्ग यांच्या भागाचा वापर करणाऱ्या प्रत्येक चालक, मालक अथवा यांत्रिकी वाहन जिच्या नियंत्रणाखाली आहे अशा व्यक्तीस पथकर स्थानक ओलांडण्यापूर्वी या नियमांतर्गत निर्धारित करण्यात आलेले उपभोक्ता शुल्क द्यावे लागेल. | (II) बदल नाही. |
| (III) वाहनधारकांना उपभोक्ता शुल्क रोखीने, ई-टॅग, स्मार्ट कार्ड अथवा ऑनबोर्ड युनिट अथवा तत्सम उपकरणाव्दारे भरावे लागेल.<br>तथापि उपभोक्ता शुल्क भरण्यासाठी ई-टॅग, स्मार्ट कार्ड अथवा ऑन बोर्ड युनिट (ट्रान्स्पाँडर) अथवा तत्सम उपकरणाच्या वापरासाठी अतिरिक्त शुल्क द्यावे लागणार नाही. | **(III) या नियमांतर्गत जमा केलेले वापरकर्ता शुल्क केवळ ई-टॅग किंवा फास्ट - टॅगद्वारे असेल, परंतु जर वापरकर्त्याला ई-टॅग किंवा फास्ट टॅग व्यतिरिक्त रोख, स्मार्ट कार्ड, पीओएस, क्रेडिट/ डेबिट कार्ड QR कोड किंवा इतर कोणत्याही माध्यमाद्वारे वापरकर्ता शुल्क भरायचे असेल किंवा वैध आणि कार्यरत नसलेले ई-टॅग किंवा फास्ट - टॅगशिवाय वाहन पथकर नाक्यावर अथवा FASTag मार्गिकेमध्ये प्रवेश करेल, अशा वाहनांच्या वापरकर्त्यास वाहनांच्या विहित त्या श्रेणीसाठी लागू असणाऱ्या शुल्काच्या दुप्पट शुल्क भरावे लागेल.**<br>**आणि असे वाढीव/ अतिरिक्त शुल्क, वसुली प्राधिकरणाकडे दैनंदिन आधारावर किंवा प्राधिकरणाशी केलेल्या सहमतीनुसार नमुद कालावधीत जमा केले जाईल.** |

| प्रचलित तरतुद | सुधारित तरतुद |
|---|---|
| (IV) एखादा चालक, मालक अथवा यांत्रिकी वाहन जिच्या नियंत्रणाखाली आहे अशी व्यक्ती जर उपभोक्ता शुल्क भरण्यासाठी/ ऑन बोर्ड युनिट (ट्रान्स्पाँडर) अथवा तत्सम उपकरण बसवू इच्छित असेल तर त्यासाठी अशा उपकरणाच्या किंमतीएवढी रक्कम यथा प्रकार राज्य शासन, अंमलबजावणी प्राधिकारी अथवा उद्योजक यांच्याकडे अनामत म्हणून ठेवावी लागेल व या अनामत रकमेपोटी कोणतेही व्याज देय नसेल. | (IV) वगळण्यात आले. |
| (V) कलम ५ च्या पोटकलम (II) खाली उपभोक्ता शुल्क घेणारी व्यक्ती, चालक, मालक अथवा यांत्रिक वाहन जिच्या नियंत्रणाखाली आहे, अशा व्यक्तीस त्याबाबत संगणकीय पावती देईल. या पावतीमध्ये उपभोक्ता शुल्क प्राप्त झाल्याचा दिनांक व वेळ, प्राप्त झालेली एकूण रक्कम व ज्या वाहनासाठी उपभोक्ता शुल्क भरण्यात आले आहे त्या वाहनाचा प्रकार यांचा समावेश असेल. | (V) बदल नाही. |
| (VI) राज्य शासन अथवा अंमलबजावणी प्राधिकारी यांच्याकडून उद्योजकाबरोबर झालेल्या सवलत करारनाम्यातील अटी व शर्तीनूसार निर्धारित करण्यात आलेल्या कालावधीसाठी उपभोक्ता शुल्क गोळा करण्यात येईल. | (VI) बदल नाही. |

****************************************

## Annexure-A

## (Rules regarding User Fee Rates, and Related Items)

As per the decision taken in the Hon'ble Cabinet meeting held on 07.01.2025, the changes made in Government Resolution, No: PPP-2013/CR No.83/Road-9, dated 31st July, 2014, Rule No.5- *Collection of User Fee* in **Annexure-A***,* are as follows-

| Current Provision | Proposed Provision |
|---|---|
| 5. Collection of User Fee<br>(I) User Fee levied under these rules shall be collected by the State Government or the executing authority or the concessionaire as the case may be at the toll plaza. | 5. Collection of User Fee<br>(I) No Change. |
| (II) Every driver, owner or person in charge of a mechanical vehicle shall for the use of the section of road, permanent bridge, bypass or tunnel, before crossing the toll plaza, pay the User Fee specified under these rules. | (II) No Change. |
| (III) User Fee collected under these rules shall be paid either in cash or through E-tag, smart card or on board unit (transponder) or any other such device: Provided that no additional charges shall be recovered for making payment of User Fee by use of a E-tag, smart card or on board unit (transponder) or any other such device. | **(III) User fee collected under these rules shall be through E-Tag or Fast - Tag only, Provided that in case the user desire to discharge the user fee by cash, Smart Card, POS, Credit/ Debit Card QR Codes or any other mode of the payments other than the E-Tag or Fast Tag, and the vehicle is not fitted with FAST Tag or vehicle without a valid, functional Fast Tag entering into the Toll plazas shall pay a fee equivalent to two times of the User fee as applicable to that Category of vehicles.**<br>**And such incremental/ additional Toll collections shall be deposited with the Authority on daily basis or such other period as agreed with the Authority.** |
| (IV) Any driver, owner or person in charge of a mechanical vehicle who opts for installation of on board unit (transponder) or any other such device for payment of User Fee shall deposit a refundable security equivalent to the cost of the equipment, with the State Government, the executing authority or the concessionaire, as the case may be, for such installation and no interest shall accrue on such security deposit. | IV) Repealed. |
| (V) Person receiving such User Fee under sub-rule (II) of rule 5 shall issue to the driver, owner or person in charge of mechanical vehicle an electronic receipt, specifying therein the date and time of such receipt of User Fee, total amount received, and the class of vehicle for which the User Fee has been received; | (V) No Change. |

| Current Provision | Proposed Provision |
|---|---|
| (VI) User Fee shall be collected by the State Government or the implementing authority or the concessionaire as the case may be and for a specified period in accordance with the terms of concession agreement entered with Concessionaire. | (VI) No Change. |

***********************************